**ग्रामीण रुग्णालय, देवगांव रंगारी, जि. औरंगाबाद येथील दंतशल्य चिकित्सक, गट-ब च्या नवनिर्मित अस्थाई पदास मुदतवाढ देणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक आरोग्य विभाग

**शासन निर्णय क्रमांकः अपदे-२०१८/प्र.क्र.१५४/आरोग्य-४**

१० वा मजला, संकुल इमारत,
गो.ते. रुग्णालय आवार, मुंबई-४०० ००१.
तारीख: ३१ ऑक्टोबर, २०१८.

वाचा

१) **शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांकः संकीर्ण-२०१२/प्र.क्र.१३०/आरोग्य-३, दि.२५.०७.२०१२**
२) **शासन आदेश, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांकः संआसे-२०१७/प्र.क्र.३/सेवा-१, दि.२.१२.२०१७**
३) **संचालक, आरोग्य सेवा, मुंबई यांचे पत्र क्रमांकः संआसे/मौ.आ./अपदे/४५३-५४/१८, दि.२५.०५.२०१८**
४) **शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांकः अपदे-२०१८/प्र.क्र.१५४/आरोग्य-४, दि.१२.०६.२०१८**
५) **शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांकः पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.७.०९.२०१८.**

शासन निर्णय

उपसंचालक, आरोग्य सेवा, औरंगाबाद मंडळ, औरंगाबाद यांच्या अधिपत्याखालील ग्रामीण रुग्णालय, देवगांव रंगारी, जि. औरंगाबाद येथील दंतशल्य चिकित्सक, गट-ब या १ अस्थाई पदाला संदर्भाधीन क्रमांक ४ येथील दि.१२.०६.२०१८ च्या शासन निर्णयान्वये दि.१.०३.२०१८ ते दि.३०.०९.२०१८ या कालावधीकरीता मुदतवाढ देण्यात आली आहे.

२. उपसंचालक, आरोग्य सेवा, औरंगाबाद मंडळ, औरंगाबाद यांच्या अधिपत्याखालील ग्रामीण रुग्णालय, देवगांव रंगारी, जि. औरंगाबाद येथील दंतशल्य चिकित्सक, गट-ब या १ अस्थाई पदाला पुढील अटींच्या अधीन राहून दि.०१.१०.२०१८ ते दि.२८.०२.२०१९ या कालावधीसाठी मुदतवाढ देण्यात येत आहे.

१) उपरोक्त पद ६ महिन्यापेक्षा जास्त काळ रिक्त नाही व ज्या कारणांसाठी पदे मंजूर केली आहेत त्या अटी व शर्तीचे पालन करण्यात आले आहे.
२) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक-पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.७.०९.२०१८नुसार विहित करण्यात आलेल्या अटी व शर्तीचे कटाक्षाने पालन करण्यात यावे व त्याप्रमाणे कार्यवाही करण्यात यावी. त्याचप्रमाणे कार्यालयाचा पदविषयक सुधारित आकृतिबंध उच्चस्तरीय समितीकडून अंतिमत: मान्य करुन घेण्याबाबत तात्काळ कार्यवाही करण्यात यावी.
३) विहीत मुदतीत पदांच्या आढाव्याची कार्यवाही पूर्ण न झाल्यास अस्थायी पदांना त्या पुढील कालावधीसाठी मुदतवाढ न मिळाल्यास व त्यामुळे अधिकारी / कर्मचारी यांच्या वेतन व भत्ताचा प्रश्न निर्माण झाल्यास त्याची जबाबदारी संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांची राहील.

३. सदर पदांवरील होणारा खर्च, मागणी क्र.आर-१, "२२१०-वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०६-सार्वजनिक आरोग्य, ००१-संचालन व प्रशासन, (००१) (०८) प्राथमिक आरोग्य केंद्राचा ग्रामीण रुग्णालयाइतका दर्जा वाढविणे, (२२१० ०४१३)" या लेखाशिर्षाखाली सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाकरीता मंजूर झालेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय वित्त विभाग, क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.७.०९.२०१८ अन्वये प्रशासकीय विभाग प्रमुखांना प्रदान केलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१०३०१७४६०११४१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pradip M Balkavde

Digitally signed by Pradip M Balkavde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8db6aab31faca2f1a89698a28c94703436c07cda664672d20607766dc59d345b, serialNumber=ed0fa40788bb5c0d7f76b869fa2e5835af215c6a80eae8f70eaf87b0cf68d63f, cn=Pradip M Balkavde
Date: 2018.10.31 16:15:36 +05'30'

**(प्र.मो.बलकवडे)**
अवर सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग,
महाराष्ट्र शासन

प्रत,

१. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई
२. सहसंचालक आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
३. उपसंचालक, आरोग्य सेवा औरंगाबाद मंडळ, औरंगाबाद.
४. महालेखापाल, १/२,महाराष्ट्र (लेखा व लेखा परिक्षा) (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर.
५. वैद्यकीय अधिक्षक, ग्रामीण रुग्णालय, देवगांव रंगारी.
६. जिल्हा शल्य चिकित्सक, औरंगाबाद
७. जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद.
८. वित्त विभाग (व्यय-१३, अर्थसंकल्प-१९ ), मंत्रालय, मुंबई.
९. अवर सचिव ( सेवा-२/ सेवा-३/ सेवा-५ /अर्थसंकल्प ), सा.आ.वि., मंत्रालय, मुंबई.
१०. निवडनस्ती ( आरोग्य- ४ ).